GR 200408041732500१ - 1201

विभागीय आयुक्तांना, प्रादेशिक विभाग
म्हणून घोषित करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
परिपत्रक:मशिले १०९७/प्र.क्र. ११९८/२०अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २९ नोव्हेंबर १९९८

पहा:-१)शासन ग्रामविकास व जलसंधारण विभाग परिपत्रक क्र. डीईएन १०८९/ प्र.क्र. ९३/[८९]/१०, २५ एप्रिल १९८९
२)शासन,ग्रामविकास व जलसंधारण विभाग, परिपत्रक क्र.झेडपीजी १०८९/सीआर ३६१५/११, दिनांक ४ डिसेंबर १९८९.

परिपत्रक:-महाराष्ट्र नागरी सेवा [सेवेच्या सर्वसाधारण शर्ती]नियम १९७८ मधील परिशिष्ठ २ मध्ये ग्राम विकास विभागाचे सचिव यांना विभाग प्रमुख म्हणून घोषित केलेले आहे. विभागीय स्तरावर कोणत्याही प्राधिकरणास प्रशासकीय कामकाज सुरळीत चालण्याच्या दृष्टीने या विभागाने प्रादेशिक विभाग प्रमुख घोषित केलेले नाही. त्यामुळे संदर्भाधीन आदेशाच्या अनुषंगाने विभागीय आयुक्तांना प्रादेशिक विभाग प्रमुख घोषित करावयाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुषंगाने विभागीय आयुक्तांना प्रादेशिक विभाग प्रमुख म्हणून घोषित करण्याचा शासनाने निर्णय घेतला असून त्यांना खालीलप्रमाणे अधिकार प्रदान करण्यात येत आहेत:-

१)महाराष्ट्र नागरी सेवा(शिस्त व अपील) नियम १९७९ नुसार वर्ग-२ चे अधिकारी यांच्या विरुद्ध शिस्तभंगाची कार्यवाही करणे व किरकोळ शिक्षा देणे.

२)महाराष्ट्र विकास सेवा वर्ग-२ च्या अधिकाऱ्यांच्या बदल्या[यासंदर्भात सामान्य प्रशासन विभाग, परिपत्रक क्र. एसआरव्ही १०९७/प्र.क्र. २०/९७/१२, दिनांक २७.११.९७ च्या परिच्छेद ५[१],[२],[५][१][ड],[२] ते [५] ,[९] [१०] व [११] मधील निकषानुसार करणे, गोपनीय अहवालाचे संस्करण, परिरक्षण व परिरक्षण करणे.

३)महाराष्ट्र नागरी सेवा,[निवृत्ती वेतन] नियम १९८२, महाराष्ट्र नागरी सेवा [पदग्रहण अवधी इत्यादी] नियम १९८१, महाराष्ट्र नागरी सेवा [रजा] नियम १९८१ आणि महाराष्ट्र नागरी सेवा[वेतन] नियम १९८१ अशा विविध नियमांच्या परिशिष्ठ १ मध्ये दर्शविल्याप्रमाणे अन्य प्रादेशिक विभाग प्रमुखांना देण्यात आलेले अधिकार.

विभागीय आयुक्तांना प्रादेशिक विभाग प्रमुख म्हणून उक्त विषयाच्या मर्यादेपुरतेच अधिकार प्रदान केलेले आहेत. हे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग

..२/-

क्र. सिक्रा १०८ प्र[अ६]/विनियम दिनांक ८ नोव्हेंबर १९९० मधील अ.क्र. अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(श्या. ना. काते)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
१) सर्व विभागीय आयुक्त
२) सर्व विभागीय चौकशी अधिकारी व सादरकर्ता अधिकारी
३) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
४) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
५) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, सर्व सह सचिव/उप सचिव
७) ग्राम विकास विभागातील सर्व कार्यासने
८) निवड नस्ती, कार्यासन क्र. १०अ